शासकीय वाहनांचा खाजगी वापरासाठी
वापर व त्याकरिता आकारावयाचे दर.

महाराष्ट्र शासन,
वित्त विभाग,
शासन निर्णय क्रमांक प्रवास-१०९०/प्र.क्र.३२०/९०/सेवा-५.
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२, दिनांक १७ ऑक्टोबर १९९०.

पहा :- शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक-प्रवास १०८७/प्र.क्र.४६४/८७/सेवा-५, दिनांक १७ ऑगस्ट १९८८.

शासन निर्णय:- शासकीय वाहनांच्या खाजगी वापरासाठीचे दर शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक-प्रवास १०८७/प्र.क्र.४६४/८७/सेवा-५, दिनांक १७ ऑगस्ट १९८८ मध्ये विहित करण्यात आलेले आहेत. केंद्र शासनाने नुकताच आयाती अधिभार लागू करून पेट्रोल व पेट्रोलजन्य पदार्थांच्या किंमतीत वाढ केलेली आहे. ती वाढ लक्षात घेऊन शासन आता असा आदेश देत आहे की, शासकीय वाहनांच्या खाजगी वापरासाठी पेट्रोल व डिझेलवर चालणाऱ्या सर्व वाहनांसाठी सरसकटपणे रु.४/- [रुपये चार फक्त] प्रतिकिलोमीटर या दराने वसुली करण्यात यावी. शासन असाही आदेश देत आहे की, खाजगी वापरासाठीची कमाल मर्यादा २५० किलोमीटर प्रतिमाह इतकी असावी. यापेक्षा अधिक खाजगी वापरास परवानगी देण्यात येऊ नये.

२. शासकीय वाहन खाजगी वापरात असताना, त्यासाठी असलेला खोळंब्याचा [ Detention ] सध्याचा दर तासास रु.२/- व कमाल रु.२०/- प्रतिदिवशी, हा तसाच चालू ठेवण्यात यावा. खोळंब्याचा काळ मोजताना पहिल्या तीन तासांचा वापर सोडण्यात यावा.

३. हे आदेश, सार्वजनिक क्षेत्रातील उपक्रम, मंडळे, इत्यादींकडील वाहनांच्या, त्यातील अधिकारी व कार्यकारी ह्यांच्याकडून होणाऱ्या वापरासाठीही लागू आहेत. मंत्रालयातील संबंधित प्रशासकीय विभागांनी, त्यांच्या नियंत्रणाखाली असलेल्या सार्वजनिक क्षेत्रातील उपक्रम, मंडळे, इत्यादींच्या नजरेस हे आदेश आणावेत.

४. हे आदेश १ नोव्हेंबर १९९० पासून अंमलात येतील.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

मं.मं. कोरगांवकर,
उप सचिव, वित्त विभाग.

प्रति

मुख्य सचिव,
सर्व अपर मुख्य सचिव,
मंत्रालयातील प्रशासकीय विभागांतील सर्व सचिव,

(कृ.मा.प.)

शासमु-रोटा-पिपि-एफ-८९६[१०,०००+१०-१०-९०]

सर्व मंत्रालयीन विभाग,
सर्व विभाग प्रमुख,
सर्व विभागीय आयुक्त,
सर्व जिल्हाधिकारी,
उप सचिव, सार्वजनिक उपक्रम कक्ष, वित्त विभाग,
महालेखापाल-१ [लेखा व अनुज्ञेयता], महाराष्ट्र, मुंबई,
महालेखापाल-२ [लेखा व अनुज्ञेयता], महाराष्ट्र, नागपूर
महालेखापाल-१ [लेखापरीक्षा], महाराष्ट्र, मुंबई,
महालेखापाल-२ [लेखापरीक्षा], महाराष्ट्र, नागपूर,
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई,
राज्यपालांचे सचिव,
मुख्य मंत्र्यांचे सचिव,
सर्व मंत्री व राज्यमंत्री यांचे स्वीय सहाय्यक,
मंत्रालयाच्या सर्व विभागांखालील विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख,
x प्रबंधक, उच्च न्यायालय [मूळ शाखा], मुंबई,
x प्रबंधक, उच्च न्यायालय [अपील शाखा], मुंबई,
x सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
x प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई,
x सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
विशेष आयुक्त, महाराष्ट्र सदन, कोपर्निकस रोड, नवी दिल्ली,
जनसंपर्क अधिकारी, मंत्रालय, मुंबई,
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
वित्त विभागातील सर्व कार्यासने,
निवड नस्ती, कार्यासन सेवा-५.

---

x पत्राने.